सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) / शाखा अभियंता (वि.व यां.) यांना उप अभियंता (वि.व.यां.) या पदावर तात्पुरत्या स्थानिक स्वरुपात पदोन्नती देण्याबाबत.
दि.०१.०४.२०१६ ची पदोन्नती कोट्याची निवडसूची.

# महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
### शासन आदेश क्रमांकः एसएलएस-२०१६/(प्र.क्र.३१२/२०१६)/आ (वर्ग-२)

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०३ ऑगस्ट, २०१७

### शासन आदेश

सोबतच्या परिशिष्ट (अ) नमूद केलेल्या सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) यांना व व परिशिष्ट (ब) मध्ये नमूद केलेल्या कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांना महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट (अ) मध्ये उप अभियंता (वि.व.यां.) या पदावर रुपये १५६००-३९१०० या वेतन बँडमध्ये रु.५,४००/- या ग्रेड वेतनवर खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती/नियुक्ती देण्यात येत आहेत. सदर पदोन्नती प्रथमत: ११ महिन्यांसाठी देण्यांत येत असून, अकरा महिन्यांनी म्हणजेच दिनांक ३० जून, २०१८ (म.नं.) रोजी ही पदोन्नती आपोआप संपुष्टात येईल.

२. सदर पदोन्नत्या या, त्यांना ज्येष्ठ असणाऱ्या अधिकाऱ्यांना व ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यांत येत आहेत. उप अभियंता (वि.व यां.) पदांवरील सदर पदोन्नत्यांमुळे, उपरोक्त अधिकारी हे नियमित पदोन्नतीसाठी पात्र आहेत, असा याचा अर्थ होत नाही व या तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नतीमुळे त्यांना नियमित पदोन्नतीचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/१२, दिनांक २८.४.२०१५, दिनांक १६.७.२०१५ व दिनांक १५.६.२०१७ मधील तरतुदीनुसार, पदोन्नत सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांना पदोन्नतीकरिता रिक्त असलेल्या पदांच्या मर्यादेत विभागीय संवर्गाचे वाटप दर्शविण्यात आलेले आहे. विभागीय संवर्गवाटप नियमावली २०१५ नुसार या अधिकाऱ्यांची पदस्थापना त्यांना वाटप करण्यात आलेल्या विभागीय संवर्गाच्या बाहेर करता येणार नाही. मुख्य अभियंता (विद्युत) यांनी पदोन्नती प्राप्त अभियंत्यांची पदस्थापना विभागीय संवर्ग प्रमाणे वाटप केलेल्या विभागांतर्गतच करुन सविस्तर पदस्थापनेचे आदेश त्यांचे स्तरावर निर्गमित करावेत व तसे शासनास कळवावे.

४. पदोन्नत सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांना शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/१२, दिनांक २८.४.२०१५, दिनांक १६.७.२०१५ व १५.६.२०१७ मधील नियम १२ मधील तरतुदीव्यतिरिक्त विभागीय संवर्गाचे वाटप कोणत्याही परिस्थितीत बदलता येणार नाही. तसेच, त्यासंबंधी अन्य कोणतीही निवेदने विचारात घेतली जाणार नाहीत.

५. पदोन्नत सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित नसल्याच्या अटीच्या अधीन राहून, सदर पदोन्नती करण्यात येत आहे. तथापि, जर त्यांचेविरुध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित असेल, तर त्यांच्या बाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

६. सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट पिटीशन क्रमांक ८४५२/२००४ च्या निकालाच्या अंतिम निर्णयाच्या व मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्याकडे दाखल करण्यात आलेल्या मूळ अर्ज क्रमांक १२०९/२०१० च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील. तसेच सदर पदोन्नती श्री. आर.के.सबरवाल विरुध्द पंजाब सरकार, या प्रकरणी शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार होत असलेल्या पुनर्विलोकनाच्या अधीन राहील.

७. सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांना त्यांच्या वयाच्या ५०-५५ वर्षाच्या करण्यात येणाऱ्या पुनर्विलोकनाच्या अधीन राहून उप अभियंता (वि.व.यां.) या पदावर पदोन्नती देण्यात येत आहे.

८. सदर पदोन्नती तात्पुरती असून, त्यांच्या मूळ संवर्गातील प्रसिध्द करण्यात आलेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीचे अधीन राहून करण्यात येत आहे. त्यामुळे, सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांना उप अभियंता (वि.व यां.) संवर्गातील ज्येष्ठतेसाठी कोणतेही अधिकार प्राप्त होणार नाहीत. तसेच सदर पदोन्नती सध्या जरी तात्पुरत्या /अभावित असली तरी कालांतराने ती नियमित होत असल्याने जे अधिकारी पदोन्नती नाकारतील त्यांची सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.९.२०१६ मध्ये नमूद केलेल्या तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल, याची संबंधितास लेखी जाणीव करुन द्यावी. एखाद्या सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांनी उप अभियंता पदावरील पदोन्नती नाकारल्यास, त्याप्रमाणे अहवाल तात्काळ शासनास सादर करावा. तसेच एखाद्या सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांनी पदोन्नती नाकारली नसेल व ते पदोन्नतीच्या पदावर रुजू होत नसल्यास त्यांचे दि.०१.०९.२०१७ पासूनचे वेतन काढण्यात येऊ नये. याबाबतची जबाबदारी मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई यांची राहील.

९. मुख्य अभियंता (विद्युत) यांनी पदोन्नती देण्यात आलेल्या अभियंत्यांचे सविस्तर पदस्थापनेचे आदेश, शासन आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून कार्यालयीन कामकाजाच्या ७ दिवसांच्या आंत करणे बंधनकारक आहे. तसेच, पदोन्नती प्राप्त अभियंते यांना परस्पर सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रतिनियुक्तीने पदस्थापना देण्याचे आदेश निर्गमित करु नयेत. त्याबाबत सविस्तर प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावा.

१०. या आदेशान्वये, पदोन्नत सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांनी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : पीएवाय-१०८२/सीआर/ ११००/(एक)/एसईआर/३, दिनांक ६.११.१९८४ नुसार वेतननिश्चिती संबंधीचा आपला विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्यांचे आत द्यावा व असा विकल्प न दिल्यास, त्यांची वेतननिश्चिती म.ना.से.(वेतन) नियम १९८१ मधील नियम ११ (१) (ए) खाली करण्यात येईल.

११. कोणत्याही सबळ कारणाखेरीज, पदोन्नतीच्या पदावर एक महिन्याचे आत सदर अधिकारी हजर न झाल्यास, ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांना दिलेली पदोन्नती रद्द करण्यांत येईल. तसेच त्यांच्या विरुध्द शासन आदेशाचे उल्लंघन केल्याबद्दल नियमानुसार कारवाई करण्यात येईल.

१२. पदोन्नती देण्यात आलेले सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व.यां.) व कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांनी उप अभियंता (वि.व यां.) म्हणून गट-अ पदाचा कार्यभार ज्या दिवशी ग्रहण केला असेल, ती तारीख शासनास त्वरीत कळवावी.

१३. उप अभियंता पदावर पदोन्नती झालेल्या अधिकाऱ्यांनी दिनांक ३१.०३.२०१७ अखेरचे मत्ता व दायित्व विवरण संबंधित कार्यालयास सादर केल्याची खात्री करुनच त्यांच्या सविस्तर पदस्थापनेचे आदेश काढावेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०३१७१५४६८८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinayak Vishwanath Lawate

Digitally signed by Vinayak Vishwanath Lawate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb6e5bc7ae10ae9ecaa376fe734f5ee18589f6a42c0c82108b047be5703d1af3, serialNumber=81fd2869906a1aeee21da3e5d509f89daa03571d84025e4321bc9f87546c02a1, cn=Vinayak Vishwanath Lawate
Date: 2017.08.10 10:59:22 +05'30'

**(विनायक लवटे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सामान्य प्रशासन विभाग (१२ व १६ ब), मंत्रालय, मुंबई,
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे) *
३. प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. मा.सचिव (जसंव्य व ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. मुख्य अभियंता (पा.) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई,
७. सह सचिव (प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अधिक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नांदेड/कोल्हापूर / पुणे
९. संबंधित सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व यां.) / शाखा अभियंता (वि.व यां.)
व्दारा : मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई
१०. कार्यासने :- आ (सअश्रे-२)/आ(शा.अ.)/आ(तांत्रिक)/आ(संनि)/गोपनीय, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आ.(वर्ग-२) कार्यासन संग्रहार्थ.

| शासन आदेश क्रमांक :- एसएलएस-२०१६/(प्र.क्र.३१२/२०१६)/आ (वर्ग-२), दिनांक : ०३ ऑगस्ट, २०१७ | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| परिशिष्ट- अ | | | | | | | |
| पदवीधर गट | | | | | | | |
| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | सहायक अभियंता श्रेणी-२ (वि.व यां.) यांचे नाव | प्रवर्ग | मागणी केलेला महसुली विभाग | नियमावलीनुसार वाटप केलेला महसुली विभाग | सध्या कार्यरत ठिकाण मंडळ/कार्यालय | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ७० | श्री.श्रीकांत सदाशिव कुलकर्णी | खुला | कोकण (१) | कोकण (१) | अधीक्षक अभियंता, कोयना (विवयां), संकल्पचित्र मंडळ, पुणे | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त कोकण (१) विभागांतर्गत रिक्त पदी |
| २ | ७१ | श्री.किरण बाळकृष्ण पाटोळे | खुला | पुणे | नागपूर | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नागपूर विभागांतर्गत रिक्त पदी |
| ३ | ७३ | श्री.संतोष रामलाल गुप्ता | खुला | कोकण (२) | कोकण (२) | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त कोकण-२ विभागांतर्गत रिक्त पदी |
| ४ | ८६ | श्री.दत्तात्रय भगवान बळीप | खुला | कोकण (१) | अमरावती | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त अमरावती विभागांतर्गत रिक्त पदी |
| ५ | ८८ | श्री.प्रताप भागवतराव गुणाले | इ.मा.व. | औरंगाबाद | औरंगाबाद | अधीक्षक अभियंता, तापी गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगाव | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त औरंगाबाद विभागांतर्गत रिक्त पदी |
| ६ | ९१ | श्री.प्रद्युम्न प्रभाकर घारे | खुला | पुणे | नागपूर | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नागपूर विभागांतर्गत रिक्त पदी |
| ७ | ९२ | श्री.बकुल कांतीलाल भोजानी | खुला | कोकण (२) | अमरावती | अधीक्षक अभियंता, तापी गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगाव | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त अमरावती विभागांतर्गत रिक्त पदी |
| ८ | ९६ | श्री.अरविंद विठ्ठल नाईक | इ.मा.व. | कोकण (२) | नागपूर | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नागपूर विभागांतर्गत रिक्त पदी |
| ९ | ९७ | श्री.भरत मार्तंड बऱ्हाटे | इ.मा.व. | नाशिक | नाशिक | अधीक्षक अभियंता, तापी गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगाव | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नाशिक विभागांतर्गत रिक्त पदी |

| शासन आदेश क्रमांक :- एसएलएस-२०१६/(प्र.क्र.३१२/२०१६)/आ (वर्ग-२), दिनांक : ०३ ऑगस्ट, २०१७ | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| परिशिष्ट - ब | | | | | | | |
| पदविकाधारक गट | | | | | | | |
| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांचे नाव | प्रवर्ग | मागणी केलेला महसुली विभाग | नियमावलीनुसार वाटप केलेला महसुली विभाग | सध्या कार्यरत ठिकाण | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ९ | श्री.शशीकांत केशवराव जाधव | खुला | पुणे | पुणे | अधीक्षक अभियंता, कोयना (विवयां), संकल्पचित्र मंडळ, पुणे | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त पुणे विभागांतर्गत रिक्त पदी |
| २ | १० | श्री.संजय अनंतराव पाठक | खुला | नागपूर | नागपूर | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नागपूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नागपूर विभागांतर्गत रिक्त पदी |
| ३ | ११ | श्री.नितीनकुमार जनार्दन महाडीक | इ.मा.व. | पुणे | पुणे | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त पुणे विभागांतर्गत रिक्त पदी |
| ४ | १४ | श्री.सुभाष रामचंद्र डबे | खुला | पुणे | पुणे | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त पुणे विभागांतर्गत रिक्त पदी |
| ५ | १५ | श्री.शिरीष गोविंद बक्षी | खुला | नागपूर | नागपूर | अधीक्षक अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, नागपूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नागपूर विभागांतर्गत रिक्त पदी |
| ६ | १६ | श्री.रविंद्र गणपती बकरे | इ.मा.व. | पुणे | नागपूर | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नागपूर विभागांतर्गत रिक्त पदी |
| ७ | १८ | श्री.धोंडिराम तिपन्ना मगदूम | खुला | पुणे | पुणे | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त पुणे विभागांतर्गत रिक्त पदी |
| ८ | १९ | श्री.सतीश श्रीधरराव पाठक | खुला | पुणे | अमरावती | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त अमरावती विभागांतर्गत रिक्त पदी |
| ९ | २० | श्री.अशोक प्रल्हाद भालेराव | खुला | नाशिक | नाशिक | अधीक्षक अभियंता, तापी गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळंगाव | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नाशिक विभागांतर्गत रिक्त पदी |
| १० | २२ | श्री.गोविंद रतनलाल सोमाणी | खुला | नाशिक | नाशिक | अधीक्षक अभियंता, तापी गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळंगाव | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नाशिक विभागांतर्गत रिक्त पदी |
| ११ | २३ | श्री.विजय विष्णूपंत खटावकर | इ.मा.व. | पुणे | औरंगाबाद | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त औरंगाबाद विभागांतर्गत रिक्त पदी |
| १२ | २७ | श्री.मोहन मुरलीधर पंडीत | इ.मा.व. | पुणे | कोकण (१) | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त कोकण-१ विभागांतर्गत रिक्त पदी |
| १३ | २९ | श्री.भिमराव रामचंद्र कांबळे | अ.जा. | पुणे | नागपूर | अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त नागपूर विभागांतर्गत रिक्त पदी |

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (वि.व यां.) यांचे नाव | प्रवर्ग | मागणी केलेला महसुली विभाग | नियमावलीनुसार वाटप केलेला महसुली विभाग | सध्या कार्यरत ठिकाण | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १४ | ४६ | श्री.सतिश बाबुराव दरंगे | वि.मा.प्र. | पुणे | कोकण (१) | अधीक्षक अभियंता, कोयना (विवयां), संकल्पचित्र मंडळ, पुणे | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त कोकण-१ विभागांतर्गत रिक्त पदी |
| १५ | ६४ | श्री.एकनाथ दामू राठोड | वि.जा.(अ) | कोकण (२) | कोकण (२) | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई अंतर्गत मंत्रालय, मुंबई | मुख्य अभियंता (विद्यूत) यांच्या अधिनस्त कोकण-२ विभागांतर्गत रिक्त पदी |